**अर्थसंकल्पीय अनुदान २०१४-१५**
महाराष्ट्र सुवर्ण महोत्सवी ग्रामीण दलित वस्ती पाणी पुरवठा व स्वच्छता योजनेअंतर्गत अनुदाने मंजूर/मुक्त करणेबाबत...
(लेखाशीर्ष २२१५ ९५९५)

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन निर्णय क्रमांकः ग्रादयो-३५१४/प्र.क्र.८९/पापु-१६

जी.टी.रूग्णालय संकुल, ७ वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई- ४०० ००१.
तारीख: ४ मार्च, २०१५

**वाचा :**

1) **शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-११११/प्र.क्र.१५६/पापु-०७, दि.१८ नोव्हेंबर, २०११.**
2) **शासन शुद्धीपत्रक क्रमांकः ग्रापाधो-११११/प्र.क्र.१५६/पापु-०७, दि.३० जानेवारी, २०१२.**
3) **शासन शुद्धीपत्रक क्रमांकः ग्रापाधो-११११/प्र.क्र.१५६/पापु-०७, दि.८ फेब्रुवारी, २०१२.**
4) **शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांकः अंदाज-२०१४/प्र.क्र.११०/अर्थ-३, दि.१ जुलै, २०१४.**

**प्रस्तावना :**

सन २०१४-१५ या आर्थिक वर्षासाठी विधिमंडळाला सादर करण्यात आलेला अर्थसंकल्प महाराष्ट्र विनियोजन विधेयक, २०१४ (महाराष्ट्र विनियोजन (लेखानुदान) अधिनियम, २०१४ यांच्या अनुसूचीच्या स्तंभ ४ मध्ये विनिर्दिष्ट करण्यात आलेल्या रकमांसह) विधिमंडळाने मंजूर केलेला आहे आणि तो सन २०१४ चा महाराष्ट्र अधिनियम क्र.१२ म्हणून महाराष्ट्र राजपत्र असाधारण भाग ८, दि.१८ जून, २०१४ यामध्ये प्रसिध्द करण्यात आला आहे.

२. संदर्भाधीन क्र.१, २ व ३ च्या शासन निर्णयान्वये, महाराष्ट्र राज्याच्या सुवर्ण महोत्सवानिमित्त, ग्रामीण दलित वस्ती पाणी पुरवठा व स्वच्छता योजना राज्यामध्ये लागू करण्यात आलेली आहे. या योजनेअंतर्गत राज्याच्या ग्रामीण भागातील अनुसूचित जातीच्या त्याचप्रमाणे नवबौध्द घटकांच्या वस्त्यांमध्ये वैयक्तिक शौचालये त्याचप्रमाणे खाजगी नळ जोडण्या देणे अभिप्रेत आहे.

३. सन २०१४-१५ या आर्थिक वर्षासाठी या योजनेसाठी विशेष घटक योजनेखाली, लेखाशिर्ष २२१५ ९५९५ एकूण रु.६०००.०० लक्ष निधीची तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आलेली असून त्यापैकी रु.३६००.०० लक्ष अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर उपलब्ध करून देण्यात आली आहे. सदर निधी संबंधित यंत्रणांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :**

सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात महाराष्ट्र सुवर्ण महोत्सवी ग्रामीण दलित वस्ती पाणी पुरवठा व स्वच्छता योजनेअंतर्गत ग्रामीण भागात घ्यावयाच्या उपाययोजनांसाठी, जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना सोबतच्या विवरणपत्रातील स्तंभ-३ मध्ये दर्शविलेल्या वाटपानुसार एकूण रु.३६००.०० लक्ष (रुपये छत्तीस कोटी फक्त) इतकी तरतूद मंजूर व मुक्त करण्यात येत असून अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर आहरणासाठी उपलब्ध करून देण्यात येत आहे.

२. सदर अनुदान संबंधीत यंत्रणांना पुढील अटींवर रोख मुक्त करण्यात येत आहे.

अ. हे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे, त्याच प्रयोजनासाठी जिल्हा परिषदेने खर्च करावे.

आ. ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी अर्थसंकल्प वितरण प्रणालीव्दारे उपलब्ध होणारा निधी जिल्हा परिषदेकडून ज्या नियमित खात्यांमध्ये जमा करण्यात येतो, त्याच खात्यांमध्ये हा निधी जमा करण्यात यावा.

इ. मुख्य कार्यकारी अधिकारी, ठाणे यांनी मुख्य कार्यकारी अधिकारी, पालघर यांना ठाणे जिल्हा परिषदेस एकूण मुक्त करण्यात आलेला निधी हा ठाणे व पालघर जिल्ह्यातील ग्रामीण भागातील अनुसूचित जातीच्या लोकसंख्येच्या प्रमाणात मुख्य कार्यकारी अधिकारी, पालघर यांना आहरीत करून द्यावा.

ई. या योजनेअंतर्गत घेतलेल्या कामांचा भौतिक व आर्थिक प्रगती अहवाल संचालक, पाणी स्वच्छता व सहाय्य संस्था, नवी मुंबई यांचेकडे दर महिन्याच्या ५ तारखेपर्यंत न चूकता सादर करावा.

उ. शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचनेप्रमाणे जिल्हा परिषदांनी या अनुदानांच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा व ताळमेळाचे अहवाल विहित कालावधीत या विभागातील कार्यासन क्र.पापु-०५, पापु-१६ व पापु-२० ला सादर करावे.

ऊ. वरील मंजूर अनुदानाची उपयोगिता प्रमाणपत्रे शासनाकडे विहित प्रपत्रात सादर करण्यात यावी.

३. यासाठी होणारा खर्च मागणी क्र.वाय-२, २२१५- पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१ पाणी पुरवठा, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (०२) (२३) अनुसुचित जाती व नवबौध्द कुटुंबीयांना वैयक्तिक पाणी पुरवठा व नळ जोडणीसाठी सहाय्यक अनुदान (२२१५ ९५९५), ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व या आर्थिक वर्षासाठी त्याखालील मंजूर तरतूदीतून भागवावा.

४. सदर शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.१९५/१४, विघयो, दि.२०.११.२०१४ व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.६८/व्यय-३, दि.९.२.२०१५ अन्वये देण्यात आलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३०४११३५५५०८२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gokhale Vidyadhar Y

Digitally signed by Gokhale Vidyadhar Y
DN: CN = Gokhale Vidyadhar Y, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2015.03.04 14:28:56 +05'30'

**(वि.य.गोखले)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रत,

१. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव
२. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय यांचे स्वीय सहायक
३. सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,मंत्रालय यांचे स्वीय सहायक
४. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
५. विभागीय आयुक्त (सर्व)
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
७. संचालक, भूजल सर्वेक्षण विकास यंत्रणा,पुणे
८. संचालक, समाज कल्याण संचालनालय, पुणे
९. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था (WSSO),बेलापूर, नवी मुंबई.
१०.अतिरीक्त संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था (WSSO),बेलापूर, नवी मुंबई.
११.महालेखापाल, महाराष्ट्र- १, मुंबई ( लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता)
१२.महालेखापाल, महाराष्ट्र- २, मुंबई ( लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता)
१३.मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई
१४.उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, नाशिक, पुणे, औरंगाबाद, अमरावती व नागपूर.
१५.अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई
१६.प्रादेशिक उप संचालक, भूजल सर्वेक्षण विकास यंत्रणा (सर्व)
१७.प्रादेशिक मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)

१८. अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)
१९.जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण विकास यंत्रणा (सर्व)
२०.जिल्हा कोषागरे अधिकारी, सर्व
२१.कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)
२२.मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
२३.कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद (सर्व)
२४.जिल्हा समाज कल्याण अधिकारी (सर्व)
२५.विशेष समाज कल्याण अधिकारी (सर्व)
२६.जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालये (सर्व)
२७.गट विकास अधिकारी, पंचायत समिती (सर्व)
२८.नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
२९. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
३०. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
३१. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व पर्यवेक्षीय अधिकारी व कार्यासने
३२.निवड नस्ती- १६

# विवरणपत्र

शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र.ग्रादयो-३५१४/प्र.क्र.८९/पापु-१६, दि. ४ मार्च, २०१५ चे सहपत्र.

| अ.क्र. | जिल्हा परिषद | या शासन निर्णयान्वये उपलब्ध करून देण्यात येत असलेला निधी (रू.) |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | ठाणे | ३४,८२,५०० |
| २ | रायगड | २६,३५,८०० |
| ३ | रत्नागिरी | २३,५६,६०० |
| ४ | सिंधुदूर्ग | १९,९५,५०० |
| ५ | नाशिक | ९४,७०,६०० |
| ६ | धुळे | ३३,७१,६०० |
| ७ | नंदूरबार | १२,५१,५०० |
| ८ | जळगाव | १,०९,६७,९०० |
| ९ | अहमदनगर | १,८१,६१,२०० |
| १० | पुणे | ३,००,००,००० |
| ११ | सातारा | १,०१,४२,६०० |
| १२ | सांगली | १,०३,३८,२०० |
| १३ | सोलापूर | १,८१,५६,२०० |
| १४ | कोल्हापूर | ३,००,००,००० |
| १५ | औरंगाबाद | १,०१,०५,१०० |
| १६ | जालना | ९२,७२,९०० |
| १७ | परभणी | ७०,७४,१०० |
| १८ | हिंगोली | ६६,२६,६०० |
| १९ | बीड | १,१४,२४,७०० |
| २० | नांदेड | १,९३,९५,६०० |
| २१ | उस्मानाबाद | ९०,६७,२०० |
| २२ | लातूर | १,५१,४२,१०० |
| २३ | बुलढाणा | १,६१,८७,९०० |
| २४ | अकोला | १,०३,८८,४०० |
| २५ | वाशिम | ८२,०१,२०० |
| २६ | अमरावती | १,४१,७७,२०० |
| २७ | यवतमाळ | १,०२,३३,८०० |
| २८ | वर्धा | ४७,०६,७०० |

| अ.क्र. | जिल्हा परिषद | या शासन निर्णयान्वये उपलब्ध करून देण्यात येत असलेला निधी (रू.) |
|---|---|---|
| २९ | नागपूर | ९५,८९,००० |
| ३० | भंडारा | ६३,५६,७०० |
| ३१ | गोंदिया | ५५,४६,८०० |
| ३२ | चंद्रपूर | ३,००,००,००० |
| ३३ | गडचिरोली | ४१,७३,८०० |
| | **एकूण** | **३६,००,००,०००** |
| **अक्षरी रूपये** | | **छत्तीस कोटी फक्त** |

Gokhale Vidyadhar Y

Digitally signed by Gokhale Vidyadhar Y
DN: CN = Gokhale Vidyadhar Y, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2015.03.04 14:30:13 +05'30'

(वि.य.गोखले)

अवर सचिव, महाराष्ट्र शासन.